**कृति आराखडया अंतर्गत किडनाशक उर्वरित अंश तपासणी प्रयोगशाळा सन २०१०-२०११ योजनेस प्रशासकीय मान्यता व केंद्र शासनाकडून प्राप्त झालेल्या पहिल्या हप्त्यामधील रु.५०.०० लक्ष इतक्या रकमेस वित्तीय मान्यता.**

**महाराष्ट्र शासन**
**कृषि,पशुसंवर्धन,दुग्धव्यवसाय विकास व मत्स्यव्यवसाय विभाग,**
**शासन निर्णय क्रमांक :किनाप्र २०१०/प्र.क्र७२/१४ अे**
**मंत्रालय विस्तार, मुंबई-४०० ० ३२.**
**दिनांक : २१ जुलै,२०१०.**

१) कृषि व पदुम विभाग, शासन निर्णय क्रमांक- किनाप्र-२००८/प्र.क्र.९२/१४ अे, दि. ३१ ऑगस्ट,२००९
२) कृषि मंत्रालय, भारत सरकार, नवी दिल्ली यांचे पत्र क्र.६-३/२०१०/एमएम, दिनांक ११ जून, २०१०.
३) कृषि व पदुम विभाग,पत्र क्र.केंपुयो-२०१०/प्रक्र.५७/(२०१०)/२-अे, दि.२३ जून,२०१०
४) कृषी आयुक्तालयाचे पत्र क्र. कृआ/गु.नि.६/१०७९/६२६/२०१०,दि. २ जुलै,२०१०.

**प्रस्तावना :-**

कृषि आयुक्तालयाच्या अधिनस्त पुणे व नागपूर येथे कार्यरत असलेल्या प्रयोगशाळांचे अत्याधुनिक उपकरणांद्वारे किडनाशक उर्वरित अंश तपासणी प्रयोगशाळा स्थापन करणे ही १०० टक्के केंद्र पुरस्कृत योजना राज्यात सन २०००-०१ पासून राबविण्यात येत आहे. आंतरराष्ट्रीय शेती कराराच्या अनुषंगाने राज्यातील कृषि मालाला प्राप्त झालेल्या निर्यातीच्या संधीच्या पार्श्वभूमीवर सध्या पुणे व नागपूर येथील प्रयोगशाळांचे आधुनिक उपकरणे व तंत्रज्ञानाद्वारे बळकटीकरण करणे आवश्यक आहे. या वस्तुस्थितीचा विचार करता सध्या अस्तित्वात असलेल्या पुणे व नागपूर येथील किडनाशक उर्वरित अंश चाचणी प्रयोगशाळांचे बळकटीकरण करण्याकरीता आवश्यक असलेल्या निधीस प्रशासकीय व वित्तीय मान्यता प्रदान करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय :-**

नागपूर व पुणे येथील किडनाशक उर्वरित अंश चाचणी प्रयोगशाळांचे नवीन तंत्रज्ञानयुक्त उपकरणांनी आधुनिकीकरण व बळकटीकरण करण्याच्या योजनेस शासन मान्यता देण्यात येत आहे. तसेच सन २०१०-११ या आर्थिक वर्षात रु. ३१९.८० लाख (रुपये तीनशे एकोणीस लाख ऐंशी हजार फक्त) एवढया निधीकरिता प्रशासकीय मान्यता देण्यात येत आहे. यापैकी केंद्र शासनाने मुक्त केलेल्या पहिल्या हप्त्यातील निधीपैकी रु.५०.०० लक्ष (रुपये पन्नास लक्ष फक्त) एवढ्या निधीस वित्तीय मान्यता प्रदान करण्यात येत आहे. सदर निधीचा विनियोग पुणे व नागपूर येथील प्रयोगशाळेस आवश्यक असलेल्या व कृषि मंत्रालय, भारत सरकार यांनी दि. ३० जून,२००९ च्या पत्रांन्वये मान्य केलेल्या बाबींवर म्हणजेच अद्ययावत उपकरणाची खरेदी व बळकटीकरण याच उद्दिष्टांसाठी करावयाचा आहे. योजनेकरिता विहित करण्यात आलेल्या भौतिक लक्ष्यांनुसार निधी खर्च करण्यात यावा. या मंजूरीच्या अनुषंगाने करावयाची कार्यवाही ही केंद्रिय कृषि मंत्रालयाने दिलेल्या मार्गदर्शक सूचना व तत्वे, शासनाचे विहित नियम व अटी, वेळोवेळी जाहीर केलेली/होणारी बंधने, मार्गदर्शक सूचना व कार्यपध्दती यांचा अवलंब करुन करण्यात यावी व याबाबतचा निधी विनियोगाचा अहवाल केंद्र व राज्य शासनास वेळोवेळी देण्यात यावा.

२. किडनाशक उर्वरित अंश चाचणी प्रयोगशाळेची उभारणी करण्यासाठीची योजना १०० टक्के केंद्र पुरस्कृत असून, या योजने अंतर्गत मंजूर निधीकरिता आयुक्त ( कृषि ) यांना प्राधिकृत करण्यात येत आहे. तसेच त्यांना आहरण व संवितरण अधिकारी म्हणून देखिल घोषित करण्यात येत आहे. या योजनेचा खर्च वित्त विभागाच्या दिनांक २०/४/२००६ च्या परिपत्रकानसार मासिक कॅश फ्लोच्या मर्यादेत राहील याची दक्षता घेण्याची जबाबदारी संबधित नियंत्रक अधिकाऱ्यांची राहील. या योजने

अंतर्गतच्या घटकांप्रित्यर्थ वित्तीय मंजूरी प्रदान केलेला पहिल्या हप्त्यातील रु.५०.०० लक्ष हा सन २०१०-११ या आर्थिक वर्षातील निधी खालील लेखाशिर्षाखाली खर्ची टाकण्यात यावा :-

मागणी क्र. डी-३
२४०१-पिक संवर्धन,
११९-बागायती व भाजीपाला पिके
११९ (०३) रोपमळे
(०३)(२३)किडनाशक अंश तपासणी प्रयोगशाळेची स्थापना व बळकटीकरण
( १०० टक्के केंद्र पुरस्कृत योजना )
३३ -अर्थसहाय्य ( २४०१ ४१६ ९ )

३. हे आदेश वित्त विभागाच्या परिपत्रक क्र. खर्चाने १००६/प्र.क्र.१/अर्थापाय दिनांक २०/४/२००६ अन्वये प्रशासकीय विभागांना दिलेल्या अधिकारानुसार प्रधान सचिव (कृषि) यांच्या मान्यतेने निर्गमीत करण्यात येत आहेत.

४. हे आदेश वित्त विभागाच्या सहमतीने त्यांच्या अनौपचारिक संदर्भ क्रमांक :१५३/१०/व्यय-१, दि.१७.७.२०१० अन्वये निर्गमित करण्यात येत आहे.

५. हा शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या वेबसाईटवर उपलब्ध करण्यात आला असून, त्यांचा संगणक सांकेतांक २०१००७१३१४५१५२००१ असा आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नांवाने,

(हेमंत भांगले)
कार्यासन अधिकारी, महाराष्ट्र शासन
कृषी, पशुसंवर्धन, दुग्धव्यवसाय विकास व मत्स्यव्यवसाय विभाग

प्रति,

आयुक्त (कृषि), महाराष्ट्र राज्य, पुणे
फलोतपादन संचालक , महाराष्ट्र राज्य, पुणे ,
व्यवस्थापकीय संचालक, महाराष्ट्र कृषि उद्योग विकास महामंडळ, मुंबई ,
संचालक ( नि व गु नि ) कृषि आयुक्तालय, पुणे,
सर्व संचालक / सर्व सहसंचालक, कृषि आयुक्तालय), महाराष्ट्र राज्य, पुणे ,
सर्व विभागीय कृषि सहसंचालक,
सहाय्यक संचालक (लेखा) कृषि आयुक्तालय, महाराष्ट्र राज्य पुणे ,
सर्व जिल्हा कृषि अधिक्षक अधिकारी,
जिल्हा कोषागार अधिकारी, पुणे, नागपूर ,
विभागीय कृषी सहसंचालक, औरंगाबाद ,
महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता/लेखापरीक्षा) महाराष्ट्र १/२,मुंबई/नागपूर
संचालक, लेखा व कोषागारे संचालनालय, मुंबई ,
वित्त विभाग (व्यय-१/अर्थसंकल्प-१२), मंत्रालय, मुंबई -३२ ,
नियोजन विभाग, मंत्रालय, मुंबई -३२ ,
सर्व सह सचिव, उप सचिव, अवर सचिव (कृषि विभाग) कृषि व पदुम विभ्ांग, मंत्रालय ,
मा. मंत्री (कृषि) यांचे खाजगी सचिव ,
मा. राज्यमंत्री (कृषि) यांचे खाजगी सचिव,
कार्यासन २-अे, कृषि व पदुम विभाग, मंत्रालय, मुंबई-३२ , निवडनस्ती ( १४ अे ).